जलसंपदा विभागाचा ई-जलसेवा
प्रकल्पांतर्गत ई जलसेवा अभियान
राबविणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन परिपत्रक क्र.ई-प्रशा १०१३/(२९६/१३)/लपा-१
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दि.१२/९/२०१३.

**परिपत्रक**

ई -जलसेवा हा जलसंपदा विभागाचा ई प्रशासन विषयक प्रकल्प १ मे, २०१३ पासून कार्यान्वित झाला असून ३३ मोड्यूल वापराकरिता संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले आहेत. या प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी तसेच विविध मोड्यूल्सचा दैनंदिन कामकाजात प्रभावीपणे वापर करण्याचा एक भाग म्हणून १५ सप्टेंबर, २०१३ (अभियंता दिन) पासून १५ ऑक्टोबर, २०१३ पर्यंत ई जलसेवा अभियान राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या अभियान काळात प्रामुख्याने खालील उपक्रम राबविण्यात यावेत.

१). 'ई जलसेवा' प्रकल्पा विषयी अधिकाधिक जागृती सर्व स्तरावर निर्माण करावी.

२). जलसंपदा विभागातील प्रकल्पांची तसेच कार्यालयीन कामकाजाची जास्तीत जात माहिती प्रणालीत भरण्यात यावी व प्रणालीत भरलेल्या माहितीची वरिष्ठस्तरावरून पडताळणी (Validation) करण्यात यावी.

३). विभागातील सर्व अधिकाऱ्यांसाठी / कर्मचाऱ्यांसाठी 'ई -जलसेवा' कार्यशाळा आयोजित करण्यात याव्यात.

४).ई जलसेवा प्रकल्पातील विविध मोड्यूलचा वापर वाढविण्यासाठी विशेष प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात यावेत.

५). सर्व शासकीय कामकाजात 'झिंब्रा मेल' हा शासकीय ई मेल आयडीचा वापर करावा

६).ई-. प्रशासन विषयक तज्ञांची व्याख्याने मंडळ व विभागीय स्तरावर आयोजित करावीत.

201502041241008527

७). प्रादेशिक / मंडळस्तरावरून विविध उपक्रम, स्पर्धा आयोजित करण्यात याव्यात.

८). प्रणालीत माहिती भरण्याविषयक तसेच ई जलसेवा बाबत आंतरविभागीय स्पर्धा, प्रश्न मंजुषा आयोजित करण्यात याव्यात.

९).ई-जलसेवा अभियान काळात उत्कृष्ट कामगिरी करणाऱ्या कार्यालयांना /कर्मचारी/ अधिकारी यांना विशेष पुरस्कार देण्यात यावेत.

२. या काळात ई प्रशासन प्रकल्प व्यवस्थापन , पुणे या कार्यालयाकडून प्रत्येक महामंडळासाठी एक संपर्क / समन्वयक अधिकारी म्हणून नेमणूक करण्यात येणार असून त्यांना प्रगतीचा आढावा देण्यात यावा.

३. प्रादेशिक / मंडळ स्तरावरील अधिका-यांनी ई जलसेवा अभियान कार्यक्रमाचा आराखडा तयार करून त्याचे नेटके आयोजन करावे.

४. दि १५/९/२०१३ रोजी अभियंता दिनाचे औचित्य साधून प्रादेशिकस्तरीय व्यवस्थापन पथक प्रमुख म्हणून मुख्य अभियंता यांनी ई जलसेवा अभियानाची सुरुवात करावी व दि १५/१०/२०१३ रोजी समारोप करावा.

५. वरील सर्व सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे व दि १५/१०/२०१३ नंतर अभियाना संदर्भात केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.

(डॉ. संजय बेलसरे)
उपसचिव

प्रत:-
प्रधान सचिव (ज.सं.) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव (मा.तं), माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यकारी संचालक,पाटबंधारे महामंडळ.
सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, मंत्रालय मुंबई.
सर्व उपसचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मुख्य अभियंता,जलसंपदा विभाग.
सर्व अधीक्षक अभियंता,जलसंपदा विभाग.